नायब तहसिलदार संवर्गातील अधिकाऱ्यांना
बदलीने पदस्थापना देणेबाबत
(कोंकण विभाग)

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन आदेश क्र.बदली-२०२४/प्र.क्र.१६२/ई-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- ३१ जुलै, २०२४

संदर्भ :- महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकिय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

**शासन आदेश : -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकिय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार, नायब तहसिलदार संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र | नायब तहसिलदाराचे नाव | सद्य कार्यरत पदनाम | बदलीने दिलेली पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. रणजित रमेश शिराळकर | नायब तहसिलदार (महसूल), तहसिल कार्यालय दापोली, जि. रत्नागिरी | निवासी नायब तहसिलदार, तहसिल कार्यालय वाडा, जि. पालघर (श्री. लाहंगे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |
| २ | श्रीम. संगिता सोमनाथ दराडे | नायब तहसिलदार करमणूक कर, जिल्हाधिकारी कार्यालय मुंबई शहर | नायब तहसिलदार (करमणूक कर शाखा), जिल्हाधिकारी कार्यालय रायगड, जि. रायगड या रिक्त पदावर |
| ३ | श्री. आर. व्ही. देवकते | नायब तहसिलदार (रेतीगट शाखा), जिल्हाधिकारी कार्यालय पालघर | निवासी नायब तहसिलदार, तहसिल कार्यालय वसई, जि. पालघर या रिक्त पदावर करण्यात (श्री.पवार यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |
| ४ | श्री. चंद्रकांत केवजी पवार | निवासी नायब तहसिलदार, तहसिल कार्यालय वसई, जि. पालघर | नायब तसिलदार (रेतीगट शाखा), जिल्हाधिकारी कार्यालय पालघर, जि. पालघर या रिक्त पदावर (श्री.देवकते यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. उपरोक्त नमूद अधिकाऱ्यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरुन या

आदेशान्वये शासन स्तरावरुन एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. संबंधित अधिकाऱ्यांनी बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे व त्याबाबतचा अनुपालन अहवाल संबंधितांनी विभागीय आयुक्त, कोंकण यांना सादर करावा.

३. सदर आदेश हेच कार्यमुक्तीचे आदेश असून संबंधित विभागीय आयुक्त / जिल्हाधिकारी यांनी नव्याने आदेश काढण्याची आवश्यकता नाही. संबंधित अधिकारी बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत deske9-rfd@mah.gov.in या ई-मेलद्वारे/टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे.

४. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयत्तेर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतुदीनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापुर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/का.१४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतुदीनुसार **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास, त्यांच्या **अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन** (dies non) **म्हणून गणला जाईल**, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. संबंधित अधिकारी बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी विहित कालावधीत रुजू न झाल्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने सदर अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्वीकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते सदर अधिकाऱ्याच्या मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७. उपरोक्त आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत असल्याने पदस्थापनेच्या ठिकाणी परिविक्षाधीन तहसीलदार वा अन्य अधिकाऱ्यांना विभागीय आयुक्त यांच्या स्तरावरुन तात्पुरते व्यवस्थेने पदस्थापना दिलेली असल्यास अशा अधिकाऱ्यांना विभागीय आयुक्त यांनी अन्य रिक्त पदावर पदस्थापना द्यावी.

८. सदरहू आदेशानुसार बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी व गैरवर्तणूक समजून त्यांचे विरूद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

९.  सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०२४०७३१२३१९४३५०१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

SHRIKANT
MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.08.01 01:44:43 +05'30'

**(श्रीकांत म. मोहिते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, कोंकण .

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२) मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
६) जिल्हाधिकारी, मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, सिंधुदुर्ग, पालघर
७) प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) मुंबई .
८) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर, मुंबई उपनगर, रायगड, सिंधुदुर्ग, पालघर
९) संबंधित आहरण व वितरण अधिकारी.
१०) सर्व संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, कोंकण यांच्यामार्फत)
११) उप सचिव (ई-९) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२